महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) (वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३००) मधील पदावर सरळसेवा नियुक्तीने पदस्थापनेमध्ये अंशतः बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ-१६२३/प्र.क्र.३१५/१६अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.**
तारीख: २१ मार्च, २०२५

<u>वाचा-</u>

१) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही २०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२,दि.१४.०७.२०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/कार्या.१२,दि.२१.०६.२०२१.
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.२१९३(१)/२०२२/१९, दि.१४ मे, २०२४.
४) कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्र.कृषिआ-१०२४/प्र.क्र.१४६/१६अे, दि.१४.१०.२०२४.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०५.२०२४ पत्रान्वये महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील पदाकरीता शिफारस केलेल्या एकूण ६५ उमेदवारांची शैक्षणिक अर्हता, वैद्यकिय तपासणी, चारित्र्य तपासणी व जात वैधता प्रमाणपत्र इ.बाबींची पूर्तता व पडताळणी करण्याच्या अधीन राहून कृषि व पदुम विभागाचे संदर्भ क्र.४ येथील दि.१४.१०.२०२४ च्या आदेशान्वये कृषि विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) (सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३००) मधील पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम-९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार केवळ तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे.

२. तथापि, उक्त शासन निर्णयान्वये नियुक्ती देण्यात आलेल्या ६५ उमेदवारांपैकी श्री.ओंकार रमेश बर्गे, दिव्यांग अस्थिव्यंग उमेदवार यांची नियुक्ती दिव्यांग प्रवर्गातून झाली असून विभागीय पसंतीक्रम सादर करताना, त्यांनी पुणे महसूल विभाग हा पसंतीक्रम सादर केला होता. परंतु, त्यांना चक्रकार पद्धतीने अमरावती संभाग वाटप करण्यात आला आहे. श्री. ओंकार रमेश बर्गे हे दिव्यांग प्रवर्गातून नियुक्त झाले असल्याने, सा.प्र.विभाग अधिसूचना दि.१४.०७.२०२१ मधील नियम क्र.७ मधील तरतूदीनुसार त्याच्या पसंतीक्रमानुसार महसूल विभाग वाटप होणे आवश्यक आहे. यानुसार श्री. बर्गे यांचे महसूल विभागनिहाय खालील तक्त्यामधील स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या रिक्त पदावर शैक्षणिक अर्हता, वैद्यकिय तपासणी, चारित्र्य तपासणी व जात वैधता प्रमाणपत्र इ.बाबींची पूर्तता व पडताळणी करण्याच्या अधीन राहून कृषि विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) (सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३००) मधील पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम-९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार केवळ तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

**३.** **नियुक्त अधिकाऱ्याचे पदस्थापनेमध्ये अंशतः बदल करुन पदस्थापनेचे ठिकाण खालीलप्रमाणे आहे**

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | शासन निर्णय दि.१४.१०.२०२४ अन्वये केलेली पदस्थापना | विभागीय संवर्ग वाटप नियमानुसार मिळालेला महसुल विभाग | सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. ओंकार रमेश बर्गे | मंडळ कृषि अधिकारी, मेहरकर-१, ता.पुसद, जि.यवतमाळ (अमरावती संभाग) | पुणे | मंडळ कृषी अधिकारी, कराड, ता.कराड, जि. सातारा. |

**४.** संबंधित उमेदवारांस महाराष्ट्र कृषि सेवा गट- ब (कनिष्ठ) मधील नियुक्ती शासनाच्या संदर्भ क्र.४ येथील दि.१४.१०.२०२४ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्ती लागू राहतील.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२११८२३४९५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT RAMESH PIMPALE

Digitally signed by PRASHANT RAMESH PIMPALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C9FC0E76E90819F7F6D29D043A3E393D7982322683A082D04EDA26B7264E4837, cn=PRASHANT RAMESH PIMPALE
Date: 2025.03.21 18:24:39 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव ( कृषि ) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती )
५. उप सचिव (आस्थापना) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. संचालक, डॉ.यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे
९. संचालक, वनामती, नागपूर
१०. कृषि सह संचालक (आस्थापना) कृषि आयुक्तालय, पुणे
११. विभागीय कृषि सह संचालक, पुणे (व्दारा आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे)
१२. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सातारा (व्दारा आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे)
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा ) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा/पुणे.
१४. संबंधित उमेदवार
१५. निवड नस्ती /१६अे.